GR-20040707123328001-0100

**प्रकल्पग्रस्त अथवा त्यांच्यावर अवलंबून असणाऱ्या व्यक्ती यांना शासकीय सेवेतील गट-क आणि गट-ड मधील पदांवर नियुक्ती देण्याबाबत अनुसरावयाची कार्यपध्दती.**

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग

शासन परिपत्रक क्रमांक:प्रकल्प-१००१/१०९/प्र.क्र.१५४/२००१/१६-अ,

मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- २३ ऑक्टोबर, २००२

संदर्भ:- १) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:एईएम-१०८०/३५/१६-अ,दि.२१.१.८०
२) शासन परिपत्रक,महसूल व वन विभाग,क्रमांक आरपीए-१०९३/प्र.क्र.१३९/र-१, दि.२२.९.९३.
३) शासन निर्णय,सा.प्र.वि.,क्रमांक:एसआरव्ही-१०९४/१००४/प्र.क्र.३०/ १६-अ,दि.१७.११.९४
४) शासन परिपत्रक,सा.प्र.वि.,क्रमांक:प्रानिमं-१२९६/प्र.क्र.१४१/९६/१३-अ, दिनांक ३.१.९७.
५) शासन परिपत्रक,सा.प्र.वि.क्र.:प्रकल्प-१०००/प्र.क्र.२७/२०००/१६-अ, दि.१३ .९. २०००.
६) शासन परिपत्रक, क्रमांक:प्रकल्प-१००१/१०९/प्र.क्र.१३/२००१/१६-अ, दि.७.४.२००१.

**शासन परिपत्रक**

प्रकल्पग्रस्त किंवा त्यांच्यावर अवलंबून असलेल्या व्यक्ती यांना शासकीय सेवेत गट क (महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेतील पदे वगळून) व गट ड मधील पदांवर नियुक्ती देण्याचे अधिकार नियुक्ती प्राधिका-यांना असल्यामुळे या संबंधात जिल्हाधिकारी यांच्या कार्यालयात असलेल्या प्रकल्पग्रस्तांच्या प्रतिक्षा यादीतील ज्येष्ठतेनुसार नियुक्त्या दिल्या जात नाहीत, असे शासनाच्या निदर्शनास आल्यानंतर दि.३.१.९७ च्या शासन परिपत्रकामध्ये अंशतः बदल करुन नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी प्रकल्पग्रस्त उमेदवाराच्या परस्पर नियुक्त्या करु नयेत, अशा सूचना दि.१३.९.२००० च्या परिपत्रकान्वये देण्यात आल्या आहेत. या परिपत्रकान्वये दिलेल्या सूचनांनुसार नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी त्यांच्याकडे रिक्त असलेल्या पदापैकी प्रकल्पग्रस्तांमधून भरावयाच्या पदासाठी मागासवर्गीयांच्या आरक्षणाला बाधा येणार नाही, याची दक्षता घेवून संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयाकडे प्रकल्पग्रस्तांच्या प्रतीक्षा यादीतील उमेदवाराची मागणी करावयाची असून, जिल्हाधिकारी कार्यालयाने प्रकल्पग्रस्त उमेदवारांच्या प्रतीक्षा यादीतून आवश्यक उमेदवारांची जेष्ठतेनुसार शिफारस संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्यांना करावयाची आहे.

२. नियुक्ती प्राधिका-यांनी प्रकल्पग्रस्तांच्या नियुक्तीसाठी संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयाकडे उमेदवारांची मागणी करावयाची आहे. तथापि काही नियुक्ती प्राधिकारी राज्य स्तरावर तसेच विभागीय स्तरावर असल्यामुळे या नियुक्ती प्राधिका-यांनी कोणत्या जिल्हाधिकारी कार्यालयाकडून प्रकल्पग्रस्त उमेदवारांची नावे मागवावीत याबाबत काही कार्यालयाकडून विचारणा करण्यात आल्या होत्या. तसेच काही प्रकल्पग्रस्त व्यक्तींनी ते रहात असलेल्या जिल्हयातील प्रकल्पग्रस्तांच्या प्रतीक्षा यादीतून दुस-या जिल्हयातील प्रकल्पग्रस्तांच्या प्रतीक्षा यादीमध्ये नाव हस्तांतरीत करण्यास मान्यता दयावी अशी विनंती केली होती. याबाबत विचार करून पुढील प्रमाणे आदेश देण्यात येत आहेत.

अ) राज्य स्तरावरील व विभागीय स्तरावरील नियुक्ती प्राधिका-यांनी गट क (महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेतील पदे वगळून) व गट ड मधील पदांवर नियुक्त्या करताना विहित आदेशांद्वारे ते जी पध्दती अवलंबवितात (उदा. जाहिरात देणे, लेखी परीक्षा घेणे, मुलाखती घेणे इ.) तीच पध्दती प्रकल्पग्रस्तांच्या नियुक्त्यांसाठी अवलंबवावी. यासाठी गुणवत्ता यादी तयार झाल्यावर नियुक्त्या करताना प्रकल्पग्रस्तांना शासनाने विहित केलेले सर्वोच्च प्राथम्य राहील याची खबरदारी घेण्यात यावी. राज्यातील कोणत्याही जिल्हयातील प्रकल्पग्रस्त उमेदवार नियुक्तीसाठी राज्य स्तरावरील कार्यालयांमध्ये अर्ज करू शकतील. तथापि विभागीय स्तरावरील कार्यालयामध्ये नियुक्त्या करताना नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी त्या विभागांतर्गत असलेल्या जिल्हयातील प्रकल्पग्रस्तांचाच विचार करावा. यासाठी विशिष्ट विभागांतर्गत असलेल्या जिल्हयातील प्रकल्पग्रस्तच

ब) प्रकल्पग्रस्त व्यक्ती एका जिल्हयातून दुस-या जिल्हयात काहीना काही कारणाने स्थलांतरीत होणार असेल व या व्यक्तीची एका जिल्हयातील प्रकल्पग्रस्तांच्या प्रतीक्षा यादीतून दुस-या जिल्हयातील प्रकल्पग्रस्तांच्या प्रतीक्षा यादीत नाव हस्तांतरीत करण्याची मागणी असेल तर त्या व्यक्तीचे नाव ज्या जिल्हयात हस्तांतरीत करावयाचे आहे त्या जिल्ह्यातील प्रतीक्षा यादी मध्ये शून्य जेष्ठतेवर (संबंधित व्यक्तीच्या अर्जाच्या दिनांकारोजी यादीमध्ये दर्शविलेल्या शेवटच्या अनुक्रमानंतर ) नोंदविण्यात यावे. असे करतांना मूळ जिल्ह्याच्या यादीतील सदर प्रकल्पग्रस्तांचे नाव कमी करण्यात आले आहे याची खात्री करून घ्यावी. मात्र प्रकल्पग्रस्तांस / त्याच्या नामनिर्देशितास नोकरी मिळाल्यानंतर ही हस्तांतरणाची सवलत मिळणार नाही. नाव हस्तांतरीत करण्याची सवलत फक्त एकदाच देण्यात यावी.

४. हे आदेश वित्त विभागाच्या पदनिर्मीती/पदभरती अतिरिक्त संवर्ग कक्ष याबाबत दि.१०.९.२००१ रोजीच्या शासन निर्णयाच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहेत. तसेच हे आदेश या परिपत्रकाच्या दिनांकापासून लागु राहतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( द. दा. देशपांडे )
अवर सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) राज्यपालांचे सचिव,
२) मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
३) उप मुख्यमंत्र्यांचे सचिव.
४) सर्व मंत्री /राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
५) मुख्य सचिव.
६) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव.
* ७) प्रबंधक,उच्च न्यायालय,मूळ न्याय शाखा,मुंबई.
* ८) प्रबंधक,उच्च न्यायालय,अपिल शाखा,मुंबई.
* ९) प्रबंधक,महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण,मुंबई.
* १०) प्रबंधक,लोक आयुक्त व उप लोक आयुक्त,मुंबई.
* ११)सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई.
* १२) सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन,मुंबई.
* १३) सचिव,राज्य निवडणूक आयोग,मुंबई.
१४) सर्व विभागीय आयुक्त,
१५) सर्व जिल्हाधिकारी/ जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१६) संचालक ,समाजकल्याण पुणे.
१७) आयुक्त,आदिवासी विकास ,नाशिक.
१८) संचालक,आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था पुणे.
१९) संचालक,सेवायोजन,मुंबई
२०) सहायक आयुक्त,(मागासवर्ग कक्ष),सर्व विभागीय आयुक्तांची कार्यालये.
२१) मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभाग / कार्यालय प्रमुख.
२३) सर्व मंत्रालयीन विभाग.
२४) सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने.
२५) निवड नस्ती.

* (पत्राने)

A:\Project affected-11
एच–893(4500–10–02)1अ.